**जागतिक बँक अर्थसहाय्यीत जलस्वराज्य प्रकल्पांतर्गत राज्य, विभाग व जिल्हा स्तरावरील अधिकारी/कर्मचारी यांच्या रजा वेतन व निवृत्ती वेतन अंशदानाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,**
शासन निर्णय क्र. जलस्व-२०१०/प्र.क्र.८६/लेखा-०३/पापु.११
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक- ३१ जुलै, २०१०.

**वाचा -** १) शासन निर्णय पा.पु.व स्व.विभाग क्र. ग्रापापु १०९९/प्र.क्र.३२८/पा.पु.०७ दिनांक २७/०७/२०००
२) शासन निर्णय पा.पु.व स्व.विभाग क्र. पीपीएमयू-२००३/सीआर-३१५५(ए)/पापु-११ दि. ३०/०६/२००३
३) शासन निर्णय पा.पु. व स्व. विभाग क्र. पीपीएमयू-२००३/सीआर-३१५५/पापु-११ दि. ३०/०६/२००३

**प्रस्तावना** :

उपरोक्त संदर्भ क्र. १ येथील दि. २७/०७/२००० च्या शासन निर्णयानुसार मागणी आधारीत लोकसहभागातुन ग्रामीण पाणी पुरवठा व स्वच्छतेचे धोरण संपुर्ण राज्यासाठी स्विकारले. या धोरणाच्या अनुषंगाने जागतिक बँक सहाय्यीत पाणी पुरवठा व पर्यावरण स्वच्छता प्रकल्प (२) पुर्वतयारी तसेच " महाराष्ट्र ग्रामीण पाणी पुरवठा व स्वच्छता प्रकल्प " (जलस्वराज्य प्रकल्प) अंमलबजावणी आराखडा (PIP) शासनाच्या पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाने तयार करुन दि. ३१/१२/२००३ पासून कार्यान्वीत केलेला आहे. या प्रकल्प अंमलबजावणी आराखडयानुसार, या प्रकल्पाच्या सर्वंकष समन्वय, अंमलबजावणी व संनियंत्रणासाठी आवश्यक असणारे, राज्य, विभाग व जिल्हास्तरीय अधिकारी/कर्मचारी शासनाच्या विविध विभागातुन प्रतिनियुक्तीने किंवा कंत्राट पध्दतीने घेण्यात यावेत असे सूचित केले आहे. त्यानुसार संदर्भ क्र. २ व ३ येथील शासन निर्णयानुसार शासन तसेच जिल्हा परिषद मधील शासकीय अधिकारी व कर्मचारी जलस्वराज्य प्रकल्पात कार्यरत आहेत. या अधिकारी / कर्मचाऱ्यांच्या प्रकल्प सेवा कालावधीसाठी रजा वेतन व निवृत्ती वेतन अंशदानाची रक्कम महालेखापाल यांचेकडे भरणा करावी किंवा कसे याबाबत संदिग्धता निर्माण झालेली आहे. या पार्श्वभूमीवर शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

जागतिक बँक सहाय्यीत पाणी पुरवठा व पर्यावरण स्वच्छता प्रकल्प (२) पुर्वतयारीसाठी व जागतिक बँक अर्थसहाय्यीत जलस्वराज्य प्रकल्पाची अंमलबजावणीसाठी प्रकल्पाचे आस्थापनेवरील राज्य, विभाग व जिल्हा स्तरावरील शासकीय अधिकारी / कर्मचाऱ्यांचे वेतनाचा खर्च शासनाच्या एकत्रित निधीतुन केला जात आहे. त्यामुळे सदरचे अधिकारी / कर्मचारी जरी प्रतिनियुक्तीने नियुक्त केले असले, तरी हे अधिकारी / कर्मचारी

स्वीयेत्तर सेवेत येत नसल्याने, या अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या सेवा कालावधीसाठी रजा वेतन व निवृत्ती वेतन अंशदान महालेखापाल यांचेकडे भरणा करण्याची आवश्यकता नाही.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक २५३/२०१०/सेवा-७ दि. २१/०६/२०१० नुसार प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१००७३१२०१५२९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

**सही**
**(सु. प्र. चानकर)**
**अवर सचिव**

प्रति :-

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा), महाराष्ट्र-०१, मुंबई.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा), महाराष्ट्र-०२, नागपूर.
३) प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४) प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
५) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
६) विभागीय आयुक्त (सर्व )
७) सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) उप सचिव व संचालक (सुसप्रव्यक) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) प्रकल्प व्यवस्थापक, (सुसप्रव्यक), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, सिडको भवन, नवी मुंबई.
१०) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
११) संचालक, भुजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
१२) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१३) सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक शाखा, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई.
१४) उप सचिव (आस्था) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) संचालक, आरोग्य विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१६) जिल्हा कोषागारे अधिकारी (सर्व).
१७) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई / बांद्रा.
१८) निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
१९) विभागीय सुलभकर्ता, जलस्वराज्य प्रकल्प (सर्व)
२०) वित्तीय सल्लागार. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, सिडको भवन, नवी मुंबई.
२१) वरिष्ठ लेखा अधिकारी, जलस्वराज्य प्रकल्प (सर्व २६ जिल्हे)
२२) वित्त विभाग (व्यय-२), (अर्थ-१६), (सेवा-७) मंत्रालय, मुंबई.
२३) रोख शाखा (सुसप्रव्यक), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
२४) सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्षातील सर्व अधिकारी व कर्मचारी सिडको भवन, नवी मुंबई.
२५) निवडनस्ती, कार्यासन क्र. पापु-११.

--------*****----------